मम्थानिकाची जर आमच्या देशातली स्थिति पाहिली, तर ती फारच शोकास्पद वाटेल सगळ्या देशभर जी लहानमोठ्या राजेरजवाड्याची राग लागत गेली आहे त्यात[1] चागले हुशार तर काय, पण सरासरी समजूत तरी ज्यास आहे असेहि फारच थोडे निघतील! मागे त्यास मोठ्या जोखमीची सरकारी कामे करावयाची पडत, शत्रूचे निरतर भय असे, त्यामुळे त्यास सतत हुशारीने राहावे लागे पण सध्याच्या काळी वरील दोन्ही प्रकार बिलकुल नाहीसे झाल्यामुळे पोरासोराची व अज्ञान लोकाची जी कल्पना की, राजाला ह्मणजे काही करावयाला नको, जेथे तेथे चाकर, निरतर पक्वान्ने खावी, ख्यालीखुशाली करावी, इतकेच त्याचे काम, ती दिवसेंदिवस पूर्णपणे खरी होत चालली आहे! 'तुम्ही काय राजे आहा!' या वाक्यात 'राजे' शब्दाचा जो अर्थ, तो दिवसेदिवस अधिकाधिक यथार्थ होत चालला आहे असे झाल्यावर मग राज्यातील व्यवस्था किती उत्तम असेल व दरबारातली मनुष्ये कशा प्रकारची असतील, याची कल्पना सहजच करता येईल, व वर्तमानपत्रद्वारे ते बहुतेक प्रकार सर्वास विदित होतातच असो, तर मग अशा ठिकाणी वरील श्लोकाचे कोणते अर्थ लागते ते आमच्या वाचकाम फोडून सागावयास नकोच!

वरील लेखावरून हे ध्यानात येईलच की, खरे जे विद्यासुख ते जुन्या पद्धतीच्या लोकास बहुतकरून मुळीच माहीत नाही यास्तव मनोरजनाचे हे माठे साधन त्यास अगदी अतरते. आमच्या मराठीत वाचण्याचे ग्रथ मुळीच नव्हते असे नाही पण ते अगोदर थोडे, आणि त्यातून दुर्मिळ गद्य ग्रथ ह्मटले ह्मणजे इतिहासाच्या किवा पौराणिक विषयाच्या बखरी, आणि पचोपाख्यान[2], विदुरनीति[3] वगैरे तीनचार पुस्तके[4] इतकीच[5] काय ती[5] पद्य–ग्रथ वरच्याहून पुष्कळ होते खरे, पण त्याचा सग्रह ह्मटला तर हरदास वगैरे लोकापाशीच काय तो! छापखान्याचे उत्कृष्ट साधन अनुकूल न-

१ त्यात म्ह० राजेरजवाड्यात, वस्तुत 'तोत' (रागेत) हवे होते —'स०'

२ पचोपाख्यान, कर्ता विष्णुशर्मा पैठण नगरीच्या सुदर्शन राजाला मूर्ख मुलगे असल्याने फार काळजी लागली होती आपल्या कुमार्गवर्ती मुलास शिकवून विद्वान् कोण करील असा सवाल त्याने दरबारात टाकताच बृहस्पतितुल्य विद्वान् ब्राह्मण विष्णुशर्मा याने सहा महिन्यात त्यास शास्त्र–पारगत करण्याचे काम अगावर घेतले मुलगे त्याच्या स्वाधीन केल्यावर त्याने पाच नीतिपर गोष्टी सागून राज्याचा गाडा हाकण्यास त्यास लायक केले हा ग्रथ पचतत्रासारखाच दिसतो, इतकेच नव्हे तर बॉन् विद्यापीठातील सस्कृत व भाषाशास्त्र याचे आचार्य Theodor Aufrecht यानी सर्व उपलब्ध याद्याचा उपयोग करून सस्कृत ग्रथ व ग्रथकर्ते याचा जो एक कॅटलॉग् (Catalogus Catalogurum) लीपझिग् येथे १८९१ साली प्रसिद्ध केला, व १८९५ आणि १९०१ साली त्यास पुरवण्या जोडल्या, त्या कॅटलॉगात पचोपाख्यान ह्मणजे पचतत्र असाच खुलासा केला आहे पण पचतत्रातील राजाचे नाव अमरशक्ति असून त्यातील नगरी महिलारोप्य नामक आहे, इतका मात्र फरक पचोपाख्यान व पचतत्र या दोन ग्रथात पडतो पचोपाख्यानाचे मराठी भाषातर १८५१ साली झाले [३ विदुरनीति व ४, ५, या टीपा पुढील पृष्ठावर पाहा]—**'सम्पादक.'**

सल्यामुळे जे आपणास हवे असेल ते हाताने उतरून घेतल्याखेरीज सोय नसे. पण या सर्वांहून जबरदस्त अडचण ह्मटली ह्मणजे लोक-शिक्षणाचा मुळीच प्रघात नसल्यामुळे लोकात विद्याभिरुचीचा जो मुळीच अभाव होता तो होय मरासरी काव्य-व्युत्पत्ति पुष्कळास असल्यामुळे पुराणादि ग्रथ, तसेच ज्ञानेश्वरी' आदिकरून प्राकृत

---

३ विदुर-नीति—विचित्रवीर्याच्या दोघी निपुत्रिक विधवा स्त्रियाच्या ठिकाणी कृष्णद्वैपायन व्यासापासून नियोगपद्धतीने वशविस्तार करण्याचा प्रयत्न दोनदा सफल न झाल्यामुळे (व्यासाच्या भीतीने एकीने डोळे झाकल्यामुळे तिला अधळा धृतराष्ट्र व दुसरी फिकी पडल्यामुळे तिला पडुरोगी फिकट पडु असे झाल्यामुळे) फिरून तिसऱ्या खेपेस सत्यवतीने दोघीनाहि व्यासाकडे जाण्यास सागितले पण भीतीमुळे स्वत न जाता त्यानी दासीस पाठविले. तिला व्यासापासून झालेला मुलगा विदुर पडूच्या पश्चात् त्याच्या लहान मुलावर ह्मणजे पाडवावर विदुराचे फार प्रेम होते लाक्षागृहाची बातमी बर्बर भाषेने याने युधिष्ठिरास कळविली नसती तर पाडव जळून गेले असते! पाडव वनवास व अज्ञातवास सपवून परत आल्यावर धृतराष्ट्राने सजयास त्याच्याकडे पाठविले व कळविले की, त्यानी अर्धे राज्य मागू नये त्यावर पाडवानी सागितलेला निरोप ('सामाने राज्य दिल्यास ठीकच, नाही तर युद्ध करून घेऊ') त्या वेळी मध्याकाळ झाल्यामुळे दुसऱ्या दिवशी सागण्याचे कबूल करून सजय गेल्यावर धृतराष्ट्रास तळमळ लागून झोपहि येईना तेव्हा तो विदुराकडे गेल्या वेळी त्याने केलेला उपदेश 'विदुरनीति' या नावाने प्रसिद्ध आहे. महाभारत, उद्योगपर्व, अध्याय ३३-५१ पाहा —**'सम्पादक'**

४ कहाण्या, पौराणिक कथा, पुराणे, शुकबहात्तरी, वेताळपचविशी, पचोपाख्यान, सिंहासनबत्तिशी, एकनाथकालीन महालिंगदासाने शेवटच्या तीन मनोरजक ग्रथाचे पद्यमय भाषातर केले आहे —**'सम्पादक.'**

५ वस्तुतः ग्रथासबधी उल्लेख असल्यामुळे 'इतकेच काय ते' असे पुलिंगी शब्द हवे होते, पण 'पुस्तके' या जवळच्या नपु शब्दामुळे चूक झाली असावी —**'सम्पादक'**

१ ज्ञानेश्वरी—ज्ञानदेवाची श्रीमद्भगवद्गीतेवर अठरा अध्यायी, सुमारे नऊ हजार (८८९६) ओव्याची व शके १२१२मध्ये ह्मणजे वयाच्या अवघ्या पधराव्या वर्षी अग्रस्थानी बसलेल्या निवृत्तिनाथासमोर भोवतालच्या श्रोत्यास नेवासे येथे उपदेशिलेली टीका प्राचीन शब्द फार आल्यामुळे ही क्लिष्ट वाटली तरी उत्कृष्ट उपमा व दृष्टान्त याची रेलचेल, लोकोत्तर, प्रेमळ, विद्वत्ताप्रचुर आणि प्रासादिक भाषासरणी, तत्त्वज्ञानाच्या गूढ सिद्धान्ताचे तेज पुज भाषेत सुगम प्रतिपादन व जागोजाग ओथबणारे उत्कृष्ट काव्य हीत आढळत असल्यामुळे हिला सारस्वताचे गोड झाड म्हणावे, की वागीश्वरी म्हणावे, की काव्यगगा म्हणावे, की धर्मक्षेत्र हे नाव द्यावे काहीच कळत नाही! शास्त्र (ज्ञान) व काव्य, बुद्धिप्रागल्भ्य व कल्पनाविकास, धर्म व काव्य याची दु साध्य सागड हीत आढळते शृगाराच्या शीर्षावर शातरसाने जणू पाय दिला आहे असे सोळाव्या अध्यायातील १-१७ ओव्या वाचल्यास वाटेल नववा अध्याय

[पुढे चालू]

ग्रंथ हजारो लोक वाचीत व अजूनहि वाचतात, पण ते केवळ पारमार्थिक बुद्धीने. ह्मणजे तसे करणे हे पुण्यकर्म आहे येवढेच समजून ते करावयाचे अर्थज्ञान किंवा रसानुभव घेऊन वाचणारे फारच थोडे असो, तर याप्रमाणे ग्रंथवाचनरूप जो करमणुकीचा उत्तम मार्ग तो पूर्वीच्या लोकास मुळीच अनुकूल नसल्यामुळे सोंगट्या, बुदबळे वगैरे खेळ, कैफ, किंवा व्यभिचार अशीच पोरकळ[1], निंद्य व लज्जास्पद साधने त्यास जवळ करावी लागत फार तर काय, पण अजूनहि नेटिव्ह् संस्थानातून बहुतेकात वरील प्रकार भरपूर आढळून येतात त्याचे केवळ दिग्दर्शन करणे हे सुद्धा एतद्देशीय मनुष्यास अत्यंत लज्जेचे व खेदाचे काम होईल

तर याप्रमाणे वाचनाचा पहिला मोठा उपयोग ह्मटला म्हणजे त्याच्या योगाने चित्ताचे उत्कृष्ट रंजन होऊन दुसरे जे अज्ञान व मूर्ख लोकाचे शेकडो करमणुकीचे उपाय त्याची बिलकुल गरज राहत नाही भर्तृहरीने[2] एके ठिकाणी[3] म्हटले आहे —

मुकविता यद्यस्ति राज्येन किम् ? ।

'उत्कृष्ट कविता जर आहे तर तीपुढे राज्य काय ?' हेच वचन बाकीच्याहि सर्व प्रकारच्या ग्रंथास लागेल खरा रसिक व विद्वान् हा आपल्या पुस्तकालयात बसून ग्रंथवाचनात निमग्न झाला असता त्यास त्या वेळेस जे सुख होत असेल, ते मोठ्या सार्वभौम राजास भरदरबारात राज्यासनावर बसल्यापासूनहि नसेल ! आणि खरोखरच नुसत्या सुखाच्या संबधानेहि पाहता ते विद्येपासून जितके साध्य होते, तितके राज्यापासून होणे नाही रोमन् लोकाचे लोकसत्तात्मक राज्य बुडून बादशाही अमल सुरू झाल्यावर पुढे जे कित्येक बादशाहा झाले त्याची हकीकत वाचली असता वरील उल्लेखाची प्रचीति कळून येईल त्याची सत्ता त्या वेळच्या बहुधा साऱ्या जगावर असताहि त्यास रात्रंदिवस चैन पडू नये शेकडो राजोपचार निरंतर चालले असता त्याचा त्यास अगदी वीट येऊन त्यानी नाना तऱ्हेचे फंद व चाळे करावे झर्सीज् नामेकरून जो पारसीकाचा[4] राजा होऊन गेला, ज्याने वीस लक्ष सैन्य जमा करून ग्रीस्

---

भक्ति–स्फूर्ति–ज्ञान याच्या त्रिवेणी–संगमामुळे उत्तमोत्तम ठरतो यात न्हाता न्हाता अनेक साधूनी जिवंत समाधि घेऊन देहविसर्जन केले नवव्याच्या खालोखाल अठरावा अध्याय होय. हा महाराष्ट्र–वाङ्मय–मन्दिरावरील जणू कळसच आहे वाग्यज्ञ संपवून, अवभृथ स्नान करून विश्वात्मक देवाजवळ या अध्यायाअखेर मागितलेले 'आता विश्वात्मके देवे' इत्यादि सर्वाच्या पाठात असलेल्या ओव्यातील पसायदान कोणत्या सहृदयाचे अंतःकरण हलवून सोडणार नाही ? —'सम्पादक.'

१. वस्तुत येथे 'पोरकट' अगर 'पोरगळ' असा शब्द हवा होता —'सम्पादक.'

२ भर्तृहरि, शतकत्रय (शृंगार, नीति, वैराग्य) व वाक्यप्रदीप या ग्रंथाचा कर्ता; इसवी सनाच्या पहिल्या शतकाअखेर अगर दुसऱ्या शतकारंभी होऊन गेला हा विक्रम राजाचा भाऊ असेहि परपरेने कित्येक मानीत आले आहेत. —'सम्पादक.'

३ नीतिशतक, श्लोक २१, चरण ४, उत्तरार्ध. —'सम्पादक'

४ पारसीक (पारशी, इराणी) हे इराण (Persia) देशाचे व तेथील लोकाचे प्राचीन नाव हा देश अफगाणिस्थानच्या पश्चिमेस होता. राजधानी तेहरान. —'सं०'

देशावर स्वारी केली, त्याविषयी[1] अशीच एक गोष्ट लिहिली आहे की, जो कोणी एकादा नवा करमणुकीचा खेळ काढील त्यास त्याच्याकडून मोठे बक्षीस मिळे असो, तेव्हा एकदरीत स्पष्ट काय दिसते की, केवळ शारीर सुखे स्वभावत च अल्पकालिक होत, त्याचा तेव्हाच वीट येऊन मन लवकरच उदास होते मौजेच्या खेळाचीहि गोष्ट तीच व्यसने तर याहूनहि भयकर, त्याच्या योगाने शरीरास बहुतकरून जन्माचा अपाय होऊन निरतर जिवास खाण्याचे मात्र साधन पैदा होते तेव्हा वरील कोणताहि दोष नसून उलटे अत्यत शुद्ध, अत्यत प्रतिष्ठादायक आणि अत्यत मनोरजनावह असे करमणुकीचे साधन एक वाचन मात्र होय

६ दुसरा लाभ ज्ञान हे सपादन करण्याचे ग्रथवाचन एक मोठे साधन आहे हे उघडच आहे सिसरोने[2] एके ठिकाणी म्हटले आहे की, लेखनकला जर नसती, तर मुळारभी जी जगाची स्थिति होती तिजपेक्षा पुढे पाऊल पडतेच ना उघडच आहे साप्रत काळी मानवजाति जी येवढ्या उत्कर्षास पोचली आहे त्या सर्वांचा मूळ पाया पाहिला तर बावन्न मातृकाच[3] होत! हल्लीच्या काळच्या आश्चर्यकारक सुधारणेची जी येवढी भव्य इमारत उभी आहे ती असख्य कारागिराच्या श्रमाचे फळ होय ! मागल्याने रचलेले थर पुढच्याच्या उपयोगी पडावे अशी आजपर्यंत अनादिसिद्ध परपरा चालत आली आहे व हीस एक कारण काय ती लिहिण्याची अमोलिक कलाच होय ही नसती तर आज लक्षावधि महाबुद्धिमान् लोकाचे अत्यत परिपक्व विचार आपणास नाहीसे झाले असते ! प्रख्यात ग्रथकार लॉर्ड बेकन्[4] याने एके ठिकाणी या मुळाक्षरास जहाजाशी तुळिले आहे. आणि[5] म्हणतो की, या जहाजानी कालरूप समुद्राच्या फार दूरदूरच्या बदरावरून आपणाकडे माल आणून[6] यापुढेहि तशाच अत्यत दूरच्या बदरात ती तो

---

१. वस्तुत 'त्याच्याविषयी' असा शब्द हवा होता २ Cicero Marcus Tullius (106 B C–43 B C) रोमन् प्रजासत्ताक राज्यातील मोठा वक्ता व तत्त्वज्ञानी याच्या ग्रथानी याची कीर्ति अजरामर केली याचा धाकटा भाऊ Quintus हा शिपाई होता दोघाचेहि ख्रि पू ४३मध्ये खून झाले ३ मुळाक्षरे —**'सम्पादक.'**

४ Francis Bacon (1561–1626) इग्लिश् तत्त्वज्ञानी व राजकारणधुरधरामध्ये पहिल्या पक्तीत बसविण्याच्या लायकीचा हा एलिझाबेथ् राणीचा ॲटर्नी-जनरल् होता, पहिल्या जेम्स्च्या कारकिर्दीत तो लॉर्ड् चॅन्सेलर् झाला त्याच्या राजकीय चारित्र्याला लाचलुचपतीचा कलक लागला व त्याचे प्रायश्चितहि त्याला भोगावे लागलेच तथापि त्याच्या लेखनातील उज्ज्वल भाषासरणी, खोल विचारसरणी आणि या दोहोवरून सिद्ध होणारी वस्तुमात्राच्या अतरगापर्यंत थेट पोचणारी त्याची सखोल दृष्टि, यामुळे त्याच्या लेखाना तत्त्वज्ञानविषयक वाङमयात अव्वल दर्जा प्राप्त झाला आहे त्याचे निबध व Novum Organum ही पुस्तके त्याचा दीर्घ व्यासग व प्रचड बुद्धिमत्ता याची उज्ज्वल स्मारकेच होत —**'सम्पादक.'**

५ 'आणि' या शब्दानतर 'तो' असा शब्द हवा 'ह्मणतो'ला कर्ता नाही —**'स०'**

६. **'आणला असून'** असे शब्द हवे होते. कारण, 'आणून' हा शब्द वापरल्यास 'जहाजानी' या कर्त्याला क्रियापद नसल्यामुळे तो तसाच लोबकळत पडतो. —**'सं०'**

पोचवितील! असो, तर याप्रमाणे सर्व काळच्या व सर्व देशाच्या महान् महान् लोकाची आपणास हवी तेव्हा, हवी तेथे, हवी तेवढी वेळ परमानदकारक सगति होण्याची जी अद्भुत सोय सर्वांस झाली आहे, तिचे मोल किती म्हणून सागावे! त्यातून अलीकडे तर मुद्रणकला, अग्निरथ वगैरे अनेक साधनानी वरील सुख तर चोहोकडे होऊन केवळ दारिद्र्यावस्थेत असणाऱ्या मनुष्यासहि ते अनुकूल झाले आहे तसेच विद्येच्या सर्व शाखावरहि अलीकडे ग्रथ होऊन[1] काही अमुक शाखाच पढल्याच्या योगाने पूर्वीच्या काळी बुद्धीवर जो सकुचित्वाचा वाईट सस्कार घडत असे तोहि हल्लीच्या काळी नाहीसा करण्याची सोय होऊन[2] अलीकडील शिक्षणपद्धतीचा मुख्य रोख तोच आहे आपल्याच देशातील पूर्वीची स्थिति पाहिली तर विद्याभ्यासाची यत्ता निदान तरी बारा वर्षे होती तितका काळपावेतो गुरूच्या घरी राहून एकनिष्ठेने जेव्हा अध्ययन करावे तेव्हा काही म्हणण्यासारखी विद्वत्ता शिष्याच्या ठायी यावी आणि इतकेहि करून बहुधा कोणत्या तरी एकाच शास्त्रात त्याची गति! न्याय[3] आहे तर व्याकरण नाही,

१ 'होऊन'बद्दल 'झाले असून' हवे २ 'होऊन'बद्दल 'झाली असून' हवे —**'सं०'**

३ **न्याय**—'विश्वोत्पादक व विश्वनियामक' अशा परमेश्वराचे अस्तित्व साख्य मानीत नाहीत "जड प्रकृतीत उत्क्रातीचे सामर्थ्य स्वभावत च असते, कर्मच त्या उत्क्रातीचे नियमन करते व आत्मा—ज्याच्याकरिता उत्क्राति होत असते तो—निष्क्रिय आहे, जग हे सत्य व अनादि आहे, कारण, 'सत् वस्तूंशिवाय अस्तित्व असणारे पदार्थ उत्पन्नच होणार नाहीत, प्रकृति अविभाज्य असली तरी ती सत्त्व, रजस्, तमस् अशी त्रिविध गुणयुक्त असल्यामुळे काही नियमानी सृष्टीच्या उद्भवाला व विविधतेला कारण होते", असे साख्य मत आहे कपिल हा या मताचा प्रवर्तक हा इ स पूर्वी सहाव्या शतकात होऊन गेला ईश्वरकृष्णकृत 'साख्यकारिका' हा या मताचा आद्य ग्रथ होय

साख्याशी विसदृश आणि सेश्वरवादी अशी दोन दर्शने, एक वेद व ब्राह्मण याच्या आधारावर, व दुसरे उपनिषदाच्या मूळ अद्वैतपर अध्यात्म विचाराचा पद्धतशीर विकास होऊन, निर्माण झाली पहिल्याचा जनक जैमिनि, यात कर्मकाडाचाच विचार आहे विधि व तत्पालनजन्य फलप्राप्ति, याचीच यात चर्चा आहे हे वेदाचे अपौरुषेयत्व मानते शब्दोच्चार अनादि व शब्दाचा त्याच्या अर्थाशी सबध सकेतजन्य नसून स्वयभू असतो असे हे मत आहे यात तत्त्वविचार नाही याला पूर्व–मीमासा, कर्ममीमासा अगर मीमासा ह्मणतात दुसऱ्या मताला उत्तर–मीमासा अगर शारीरक मीमासा म्हणतात याच्या 'तत्त्वमसि' या प्रमुख सिद्धान्तावरून जीवात्म्याचे तादात्म्य अगर अनन्यसादृश्य व्यक्त होत असल्यामुळे याला 'अद्वैत' असेहि म्हणतात 'जीवात्मा परमात्म्याचा अश अगर व्यक्त स्वरूप आहे' असल्या मिथ्याभासाचे कारण अविद्या किंवा स्वयभू अज्ञान होय, असे मानणाऱ्या या मताचा आधारभूत ग्रथ बादरायणकृत ब्रह्मसूत्र हा होय

'न्याय' हे दर्शन कणादाच्या वैशेषिकाचेच विकसित स्वरूप होय यात विध्यनुरूप तर्कशास्त्राचे विस्तृत विवरण आहे गौतमाचे 'न्यायसूत्र' हा या दर्शनाचा आ-

[पुढे चालू.]

व्याकरण आहे तर मीमासा[1] नाही, असा प्रकार अर्थात्च होत असे कारण जे शास्त्र हाती धरावयाचे ते शेवटास पोचविल्यावाचून थाबावयाचेच नाही, ही त्याची शिक्षण-पद्धति पुष्कळ तऱ्हेवाईकच होती यात सगय नाही तिचा एक मोठा गुण होता खरा, की जेवढे म्हणून कोणी शिकेल तेवढे अगदी ठाम! एकदा त्याचे पठण झाले म्हणजे त्यात लेचेपेचेपणा बिलकुल राहावयाचा नाही कोणतेहि शास्त्र घेतले की, त्यावरील मुख्य ग्रथ, उपग्रथ, टीका, प्रतिटीका वगैरे जेवढे म्हणून ग्रथ असतील तेवढे पार मुखोद्गत केल्यावाचून प्राय सोडावयाचे नाहीत! मुळी परपरेनेच तशी वहिवाट चालत आलेली! गुरु आपल्या आसनावर बसून पक्ति सागावयाला लागले म्हणजे शिष्याच्या हातात जेवढे पुस्तक असेल तेवढेच काय ते, गुरूनी म्हणून पाठ सागताना पोथी हाती धरावयाचीच नाही! तसे करावे लागले तर तो गुरु कसचा? असो, तर असाच बाणा पूर्वीपासून चालत आलेला असल्यामुळे पुढे जे शिष्य गुरुस्थानापन्न होतात, तेहि तो तसाच पुढे अबाधित चालवितात याप्रमाणे अलीकडची जी पोपटपची तीस पूर्वी मुळीच थारा न[2] मिळून[2] जे कोणी पडित होत, ते आपआपल्या शास्त्रात केवळ निष्णात असेच होत अलीकडील इग्रेजी युनिव्हर्सिटीच्या पद्धतीने म्हटले म्हणजे हवा तो विषय ज्यास अवगत आहे असे विद्वान् तयार करावयाचे! हमालाचे जसे टप्पे असतात, त्याप्रमाणे आधीच नि शक्त झालेल्या आमच्या गरीब विद्यार्थ्यांवर वर्षानुवर्ष अधिकच विषयाचे ओझे लादून त्यानी अमुक दिवसात अमुक मजल मारली पाहिजे असा ठराव झालेला असतो मग विद्यार्थीहि निरुपायास्तव जेमतेम करून तेवढी यातायात करतात, पण एकदा सुटले म्हणजे बुकाना जी एकदा रजा मिळते ती मिळते त्याच्या कृपाळू आईने येवढा खटाटोप करून जे नाना विषयाचे ज्ञान त्याचे ठायी साठविले[3] असते[3] ते लवकरच घालवून ते बहुधा पहिल्यासारखेच पुन लखलखीत होऊन बसतात! असो, तर या मानाने पाहता पहिली एकधोरणी रीतच काही अशी बरी होती असे आम्हास वाटते तरी अली-

धार–ग्रन्थ आहे न्याय व वैशेषिक दोन्ही मताना ईश्वरास्तित्ववाद कालान्तराने मान्य झाला असला तरी प्रकृतीला कोणी जनक आहे हे मात्र त्यास मान्य नाही पतजलीचे योगदर्शन, जीवात्मा व परमात्मा याच्या ऐक्याचा (ह्म०आतमा ब्रह्मस्वरूप होण्याचा) मार्ग एकाग्र ध्यान होय असे प्रतिपादिते

१ मीमासा—षड्दर्शनापैकी एक या आर्य तत्त्वज्ञानपद्धतीचे दोन प्रकार आहेत. (१) पूर्वमीमासा ऊर्फ कर्ममीमासा ऊर्फ मीमासा (सस्थापक जैमिनि), वेदवाङमयातील वादग्रस्त वाक्याचा अर्थ निश्चित करणे व वैदिक धर्मविधीचे बिनचूक अर्थ लावणे हे या मीमासेचे दोन उद्देश (२) उत्तरमीमासा ऊर्फ ब्रह्ममीमासा ऊर्फ अद्वैत वेदात (सस्थापक बादरायण); ब्रह्मस्वरूपनिर्णय हा हिचा उद्देश या दोन्ही मीमासा स्वतत्र आहेत, परस्परावलबी नाहीत नावावरून उत्तरमीमासा पूर्वमीमासेचा उत्तरार्ध अगर परिपाक असेल असे वाटणे सभवनीय असले तरी वस्तुस्थिति तशी नाही २. 'मिळत नसून' असे हवे —'**सम्पादक**'

३ वस्तुत 'साठविलेले असते' असे शब्द हवे नाही तर सकेतार्थ होईल —'**स०**'

कडे जे सर्व विषयावर उत्कृष्ट रीतीने लिहिलेले ग्रथ युरोपातील भाषात झालेले आहेत, त्याच्या योगाने फार काळ व श्रम न पडता मनुष्याचे मन विशाल व बहुश्रुत होते, व पूर्वीच्या पद्धतीने मनास जडणारे जे वेडेपणाचे ग्रह व दुष्कल्पना त्या यामुळे[1] बहुतेक नाहीशा होऊन जातात, हा लाभ लहानसान म्हणता येत नाही.

७ याप्रमाणे प्रकृत विषयाविषयी सामान्यत काही विचार प्रदर्शित केले. आता खुद्द आपल्या स्वत च्या स्थितीविषयी काही लिहून हा विषय सपवितो

८ आता पहिल्याने हे उघडच आहे की, वाचन म्हटले म्हणजे अगोदर भाषेत ग्रथसग्रह पाहिजे आमच्या मराठीत तो मूळचा कोणत्या प्रकारचा होता हे वर[2] लिहिण्यात आलेच आहे तसेच अलीकडे तो कोणत्या प्रकारचा झाला आहे व होत आहे याविषयीहि प्रस्तुत मालेच्या पहिल्या दोन अकात[3] काही लिहिले आहे आता हा ग्र-

१ यामुळे म्ह० युरोपीय ग्रथामुळे नव्हे तर मनुष्याचे मन विशाल व बहुश्रुत होण्यामुळे २ पृष्ठे ३५–३६ पाहा —'सम्पादक.

३ "इतर ग्रथाचा भरणा आपल्या भाषेत अद्याप मोठासा झाला म्हणता येत नाही इग्लिश् भाषेत पहिल्यानेच गति होऊन तीतील सुरस ग्रथाची आपल्या लोकास जेव्हा गोडी लागली, तेव्हा त्यासारखे आपल्याहि भाषेत काही करावे अशी त्यास सहजच मोठी हौस वाटली मग पुष्कळानी हा उद्देश भाषातरद्वारा सिद्धीस नेला याच्या योगाने लोकाचे पुष्कळ हित झाले पुढे कित्येकानी यावरहि तोड करण्याचे मनात आणले कोणी इग्रेजी ग्रथाच्या नमुन्यावर कल्पित कथा, नाटके व इतर ग्रथ केले, व कोणी इग्रेजीतीलच गोष्टीचे देशाचारानुरोधाने रूपातर करून मराठी ग्रथ बनविले तशीच सस्कृतातूनहि काव्यादि ग्रथाची भाषातरे होऊन भाषेची व रसिकत्वाची लोकात वृद्धि होण्यास बरीच कारणे झाली याप्रमाणे तऱ्हेतऱ्हेचे ग्रथ होऊन मराठीस पुष्कळ शोभा येत चालली होती पण सध्या दोघाचा मात्र आश्रय तीस उरला आहे एक पाद्री लोकाचा व दुसरा निजवर उपजीवन करणाऱ्या अर्थलुब्ध ग्रथादिकर्त्याचा. पण यावरून सध्या छापली जाणारी सारी पुस्तके येथून तेथून अगदी नादान असतात असा आमच्या लिहिण्याचा अभिप्राय कोणी समजू नये" (अक १)

" विद्येचा इतका फैलाव झाला असता व तिची साधने इतकी वाढली असता वर्तमानपत्राची जशी भरभर झाली तशी पुस्तकाचीच का होऊ नये? विद्वान् लोकाची मराठी भाषेविषयीची उपेक्षाबुद्धि, वर्तमानपत्रेच वाचण्याकडे जुन्या नव्या अशा एकदर लोकाची प्रवृत्ति आणि वर्तमानपत्रातील मजकूर कसाहि असला तरी तो लोकापुढे फार वेळ राहत नाही पण पुस्तकात दर वेळेस काही तरी नवे असावे लागते, व इतर पुस्तकातील उतारे त्याला राजरोस घेता येत नाहीत त्यात जो लेख एकदा पडला तो पडला, त्याची चर्चा होण्याचा पुष्कळ दिवस सबध असतो. . इतकी सर्व पाने स्वत च्या मजकुराने भरून शिवाय त्यात दोष न राहण्याविषयी मोठी खबरदारी ठेवावी लागते, ही पुस्तके मागे पडल्याचीं आमच्या मते तीन कारणे होत मराठी भाषेसबधाने मुख्य अचाट काम म्हणजे कोश, हे इग्रजानीच आ-

[ पुढे चालू ]

थसग्रह सगळा एकदरीत धरला तरी अर्वाचीन युरोपियन् भाषाशी किंवा सस्कृतादि प्राचीन भाषाशी त्यासबधे' आमच्या गरीब मराठी भाषेस टक्कर मारता येईल हे अगदी सभवत नाही खरे, तरी सध्याच्या स्थितीत सुद्धा तीस आपल्या दारिद्र्याचास्तव केवळ खालीच पाहावयास हवे असे आम्हास अगदी वाटत नाही एतद्देशीय इतर भाषात तर तिच्याहून कोणच्याहि सबधे वरचढशी भाषा एकहि नाही असे आम्हास वाटते, तसेच सुमारे तीनचारशे वर्षापूर्वी इंग्लिश् वगैरे युरोपियन् भाषाची जी स्थिति होती तीपेक्षाहि सध्या देखील तिची स्थिति बरी आहे साराश, केवळ अज्ञानास्तव, दुराग्रहास्तव व आळसामुळे मराठीचा जे तिरस्कार करू पाहतात व तिची ज्यास मोठी लाज वाटते त्यास तसे करण्यास वरच्याशिवाय 'दुसरे कोणतेहि समर्पक कारण नाही हे त्यानी पक्के समजावे तसेच जे फाकडे नवीन विद्वान् जुन्या गालजोडीवाल्या शास्त्र्याप्रमाणे मराठी भाषेवर नाक मुरडतात त्यावर दोन प्रकारचा दोष येतो एक तर जिचे ज्ञान आपण पुरतेपणी कधीहि सपादन केले नाही तीस विनाकारण दूषण देणे हे, आणि दुसरे असे की, जी न्यूनता त्यानी पूर्ण करावयाची ती न केली हे तर एकीकडच राहिले, पण पुन तीबद्दल भाषेसच दोष ! भाषेच्या अगी रानातील जमिनीप्रमाणे तर शक्ति नाही ना ? की तीत जसे गगनचुबित वृक्ष आपोआप उत्पन्न होतात व वाढतात त्याप्रमाणे मोठमोठे ग्रथ भाषेत आपले आपोआप व्हावे ! काव्ये, नाटके, कादबऱ्या, शास्त्रीय ग्रथ हे केवळ स्वत च उत्पन्न व्हावे, मनुष्याच्या श्रमाची ह्मणून त्यास बिलकुल गरज लागू नये, असा जर सृष्टीचाच नियम असता, तर बरीक वरील मराठीवरची दूषणे ठीक होती ! पण अशी स्थिति मुळीच नाही हे स्पष्ट आहे ग्रथसग्रह हे मुख्यतः उद्योगाचे फळ होय मोठमोठे कवि, कादबरीकार, किंवा शास्त्रकार वगैरे निपजणे ही गोष्ट केवळ एकेका देशाच्या भाग्याची होय, ती येथे धरावयाची नाही पण एकदर लोकाच्या हितार्थ इतर भाषातील ग्रथाची भाषातरे करणे किंवा त्याच्या नमुन्यावर आपल्या भाषेत तसे ग्रथ उतरणे, असल्या सामान्य कृत्याकरिता ईश्वराचे लालच निर्माण झाले पाहिजेत असे नाही ! सुताराचे, शिप्याचे वगैरे काम जसे त्यात काही दिवस पडले ह्मणजे बहुधा सर्वास येण्यासारखे आहे तशाच मासल्याची वरील कामे होत इंग्लिश् भाषेत जे आज लाखो ग्रथ झाले आहेत त्या सर्वांचेच कर्ते प्रतिमिल्टन्,[1] प्रतिन्यूटन्[2]

---

णाकरता करून ठेवले आहेत या कोशानी महाराष्ट्र भाषेवर जे उपकार करून ठेवले आहेत त्यास पार नाही ते तयार करताना शास्त्री लोकाचे साह्य पुष्कळ घेतले, व दोघा साहेबास (मोल्स्वर्थ् व कँडी) सरकारने मोठे बक्षीसहि दिले, हे खरे पण .तितके किंवा त्याहून चौपट सहाय्य मिळाले असते तरी येवढे काम अगावर घेण्यास आमचे विद्वान् कितीक तयार होते ?. सध्या मराठी लिहिण्याची इच्छा आहे एकास व शक्ति आहे दुसऱ्यास "(अक २) —'सम्पादक.'

१. 'त्यासबधे' म्ह० ग्रथसग्रहाच्या सबधात अगर बाबतीत —'सम्पादक.'

१ जॉन् मिल्टन् (१६०८–१६७४) वीररसप्रधान काव्ये लिहिणारा इंग्लड्मधील [ही व २ न्यूटन् या टीपा पुढील पृष्ठावर पाहा.]

असे आहेत काय? काही नाही! पुष्कळ अशी त्या लोकाच्या अचाट उद्योगाचेच केवळ ते फळ होय पण आमच्यात बहाद्दर पाहा कसे आहेत! नाव लिहावयाचे झाले तर पुढे हात सव्वा हात किताब, देशाभिमानाविषयी तर पहिल्या प्रतीचा बाणा, देशकल्याणाचे कोणतेहि काम निघो, त्यात प्रमुख मडळीत नाव, पण देशभाषेत जर चार शब्द बोलण्याचा किंवा लिहिण्याचा प्रसग आला, तर बहुधा प्राणसकटच! असो, तर जेथे स्वभाषेचे येवढे ज्ञान व तीविषयी येवढी आस्था दृष्टीस पडते तेथील स्थिति काय सागावी? ती सर्व प्रकारे अत्यत शोचनीय असून तिच्या सबधे येथवर अनेक वेळा मागे आम्ही लिहिलेच आहे, यास्तव ज्यास्त पुन लिहिण्याची गरज दिसत नाही असो, एकदरीत मराठीतील ग्रथसग्रहाविषयी आम्हास असे वाटते की, सध्या तो जितपत आहे त्याची इतराच्या मानाने पाहता फार मोठी योग्यता जरी नाही, तरी आम्ही सध्या जितपत स्थितीस येऊन पोचलो आहो तितक्या स्थितीला तो चागला उपयोगी पडण्यासारखा आहे, व आमचे पाऊल जसजसे पुढे पडत जाईल त्यात्याप्रमाणे आमच्या भाषेची, अगची योग्यता व लोकाचे कर्तृत्व पाहता तो वाढत जाण्याचेहि आम्हास अगदी कठिण वाटत नाही

९ आता वाचनाचा प्रघात आपल्या लोकात सध्या कितपत आहे तो पाहू पूर्वीच्या पद्धतीचे जे लोक आहेत त्याच्या वाचनाचा वर[१] एक प्रकार सागितलाच आहे,—— की ज्ञानेश्वरी, भगवद्गीता[२] अशासारखे ग्रथ ते नियमाने वाचतात, पण ते केवळ भाविकपणाने, म्हणजे आपण जे वाचतो त्याचा अर्थ आपणास कळावा इतकीसुद्धा

---

धील प्रमुख कवि पॅरॅडाइज् लॉस्ट् हे याचे इग्लिश् भाषेतील मोठचात मोठे वीररसप्रधान काव्य चार्लस्चा वध केल्यावर क्रॉम्वेल्ने याला कॉमन्वेल्थ्चा लॅटिन् सेक्रेटरी केले १६५२ साली हा पुरा अधळा झाला वेस्ट्मिन्स्टर् ॲबेमध्ये याचे स्मारक उभारण्यात आले याने पॅरॅडाइज् लॉस्ट् व पॅरॅडाइज रीगेन्ड् याशिवाय कित्येक ऐतिहासिक, राजकीय व भक्तिरसात्मक लेख व ग्रथ लिहिले आहेत याची युरोपीय पचमहाकवीत (ग्रीक् होमर्, रोमन् व्हर्जिल, इटॅलियन् ॲरिओस्टो व टासो आणि इग्लिश् मिल्टन्) गणना होते ——'सम्पादक.'

२ न्यूटन् (१६४२–१७२६) इग्लिश् खगोलशास्त्रज्ञ. याने पृथ्वीचे आकर्षण इ० आर्य शोधाचे पुनरुज्जीवन करून दुर्बिणीतहि बऱ्याच सुधारणा केल्या ——'सम्पादक.'

१. पृष्ठ ३६–३७ पाहा ——'सम्पादक.'

२ भारतीय युद्धात होणाऱ्या कुलाच्या व ज्ञातीच्या क्षयामुळे घाबरून किंकर्तव्यमूढ झालेल्या अर्जुनाला क्षत्रियधर्मानुसार युद्ध सोडून सन्यास घेणे गैर, बुद्धिप्रधान कर्मयोगच अधिक श्रेयस्कर व ब्रह्मात्मैक्यभावनेने व साम्यबुद्धीने स्वधर्मप्राप्त कर्तव्यपालनच मोक्षप्रद, असे रणागणावर सागून श्रीकृष्णाने त्याला युद्धास तयार केले हा सवादात्मक उपदेश श्रीमद्व्यासानी आपल्या महाभारत नामक काव्यग्रथात, अठरा अध्यायात व अनुष्टुप् छन्दातील सातशे श्लोकात समाविष्ट केला असून तो 'श्रीमद्भगवद्गीता' या नावाने फार लोकप्रिय झाला आहे हिंदुस्थानातील लाखो लोक पिढ्यानुपिढ्या भगवद्गीता मुखोद्गत करीत आले आहेत. ——'सम्पादक.'

थोड्याचीच इच्छा असते! हे असले वाचन विद्येच्या दृष्टीने केवळ निरर्थक होय हे उघड आहे. आता नव्या पद्धतीचे लोक पाहू यापैकी फार करून सगळ्याचे मुख्य वाचन ह्मटले ह्मणजे वर्तमानपत्रेच होत माजसकाळ लायब्ररीत खेप घालून आले म्हणजे त्या दिवसाचे कर्तव्यकर्म आपण बजावले असा पुष्कळाचा समज दिसतो पण खरोखरीची जी लायब्ररी तिजकडे[1] बहुधा कोणी महिन्याचे महिने ढुकूनहि पाहत नाही तेथे खरा अक्षय वास ह्मटला ह्मणजे अधाराचा व केराचा, पुस्तकाचा खरा चालक[2] ह्मटला ह्मणजे महिन्या दोन महिन्यानी त्यावर साचलेला मळ झाडणारा गडी, आणि त्याचे खरे उपभोक्ते[3] ह्मटले ह्मणजे कृमिकीटक! हा हास्यास्पद प्रकार बहुधा जेथे तेथे दृष्टीस पडत असेल यात सशय नाही पण याबद्दल कोणासहि कधी काही चमत्कार वाटला आहे, किवा तो मोडावयाचे मनात आले आहे, असे बिलकुल आढळत नाही! याचे कारण काय असावे बरे? एकदर लोकात एकाएकी ज्ञानाची भरती येऊन आजपर्यंत मोठे मानलेले ग्रथहि त्यास आज एकदम नादान वाटू लागले? किवा देशात विद्येची अगदी रेलचेल होऊन गेल्यामुळे अधिक शिकण्यास आता जागाच उरली नाही? अथवा सर्व लोक एकदर लोककल्याणाच्या कामास लागून मार्ग तयार करण्याच्या किवा कलाकौशल्य वाढविण्याच्या कामास तर गुतले नाहीत ना! काय असेल ते असो याचे कारण आम्हास एक सुचते ते हे की, वरच्यासारखे प्रकार केवळ लोकाचाराचे[4] होत. सुधारलेले शहर ह्मटले ह्मणजे जशी त्यात म्युनिसिपालिटी पाहिजे, सभागृह, नाटकगृह वगैरेहि अवश्य आलीच, त्याचप्रमाणे पुस्तकालय त्याची एकदा स्थापना होऊन गेली पाहिजे! मग पुढे त्याची व्यवस्था काही का होईना? त्याचा मूळचा अर्थ असा खरा, की उपयुक्त व मनोरजक पुस्तके त्यात ठेवून ती लोकानी वाचावी, व तेणेकरून ज्ञानप्राप्ति करून घेऊन देशभाषेत नसे ग्रथ रचण्याची त्यास उमेद यावी, व पहिल्यापहिल्याने हा त्याचा उद्देश बराच सिद्धीस गेला पण त्याचे आता काय? जे पहिल्याने खरोखर उपयोगाकरिता होते ते आता केवळ शोभेचे कलम झाले आहे! साराश, आमच्या राजेरजवाड्यास कमरेस रेशमी म्यानात लटकणाऱ्या तरवारीचा जितका उपयोग, किवा कित्येक शौकीन गृहस्थाच्या बड्याच्या कप्यात[5] टिकटिक करणाऱ्या धाकट्या घड्याळाचा त्यास जितका उपयोग, तितकाच घरच्या दिवाणखान्यात सुदर सोनेरी पुठ्ठे करवून नीट बेताबेताने ठेवलेल्या लायब्ररीतील बुकाचा! असो, एकदरीत सागावयाचे काय की, याप्रमाणे ग्रथवाचनाचा प्रघात बहुतेक मोडून नुसती वर्तमानपत्रेच वाचण्याकडे आमच्या लोकाचा दिवसेदिवस कल होत चालला आहे. यावरून वर्तमानपत्रे वाचणे अगदी निरर्थक, त्यास लोकानी आश्रय देणे अगदी गैर आहे, असे म्हणण्याचा आमचा बिलकुल रोख नाही ती वाढणे हे भाषेच्या सबधाने व सरकारच्या सबधाने लोकास फार हितावह होय अशी आमची पक्की खात्री आहे पण त्यापलीकडे ज्ञा-

१. ग्रथ-सग्रहाकडे २ हलविणारा, साफसूफ करणारा ३. ज्ञानाचा आस्वाद घेणारे नव्हेत तर कागद खाऊन अगर कुरतडून टाकणारे ४ परपरागत; इतरत्र असल्यामुळे आमच्या देशातहि जरूर ५ कप्यात ह्म० खिशात. —**'सम्पादक.'**

नाचे साधनच नाही, ही जी लोकाची समजूत होत चालली आहे ती मात्र फार गैर आहे, हे आम्हास दाखविणे आहे वर्तमानपत्रे वाचणे हे इग्रेज लोक सकाळी जसा चहा घेतात त्यासारखेच पुष्कळ अशी होय. ह्मणजे अर्धे पोषण, अर्धी करमणूक, असाच दोहोचा प्रकार आहे. शरीराचा निर्वाह होऊन त्याचे यथास्थित पोषण होण्यास जसे चागले जेवणच पाहिजे, त्याप्रमाणेच खरी उपयोगाची अशी विद्वत्ता ज्यास सपादन करणे असेल त्याने मोठमोठ्या नानाविधविषयक ग्रथाचा ऊहापोहपूर्वक यथास्थित व्यासगच केला पाहिजे हे परिश्रम केल्याने आलेला शीण घटकाभर दूर करण्यास व जगात काय उलाढाली चालल्या आहेत त्या समजण्यास वरील पत्राचा आदर करणे बरोबर आहे, पण त्यास विद्येच्या शिखरावर बसवून ठेवणे हे अगदी शोभत नाही. फार तर काय, पण कित्येक मोठमोठ्या ग्रथकाराचे असेहि मत आहे की, वर्तमानपत्रे, मासिक पुस्तके, इत्यादिकाची समृद्धि लोकास अपायकारक होय का की, हीच चाळून पाळून वरवर वाचण्याची सवय एकदा मनास लागून गेली म्हणजे विचारपूर्वक व शोधक बुद्धीने मोठमोठे ग्रथ सावकाश वाचण्याचा मनास कटाळा येऊ लागतो व यामुळे वरवरचे शुष्क पाडित्य मात्र चोहोकडे माजून खऱ्या विद्वत्तेचा लोप होतो

१०. प्रस्तुत विषयावर निरनिराळ्या सबधाने[1] आणखी पुष्कळ लिहिता येईल पण सरतेशेवटी एका मात्र गोष्टीविषयी काही लिहून हा निबध आटपतो ज्यास ग्रथ वाचण्याचा नाद असतो, किवा डौलाकरता जे तसा आव घालतात, ते बहुधा आपली विद्वत्ता वाचलेल्या पानाच्या सख्येवर लेखतात म्हणजे जितकी पाने आपण वाचली तितक्या मानाने आपले ठायी अधिक ज्ञान आले असे ते समजतात पण हा केवढा भ्रम आहे हे हवे त्यास अमळ विचार केला असता कळण्यासारखे आहे जितके जितके ज्याने वाचले तितका तितका तो विशेष ज्ञानसपन्न व शहाणा असे जर असते, तर सध्याचा काळ जगाच्या मागील सर्व काळापेक्षा ज्ञानात व शहाणपणात श्रेष्ठ असता, कारण, हल्ली जितके ग्रथ झाले आहेत व होताहेत, व लोकात वाचनाचा सध्या जेवढा प्रचार आहे त्याचा लक्षाशहि प्राचीन काळी नव्हता पण चमत्कार पाहा काय आहे, की अत्यत प्राचीन काळचे महान् महान् ग्रथकार कीर्तिमदिराच्या अत्युच्च पदावर जे एकदा अढळ बसले आहेत ते आहेत! हल्लीच्या काळी ज्ञानाचा केवढाहि फैलाव झाला तरी त्याची सर कोणासहि येत नाही! तेव्हा यावरून स्पष्टच दिसते की, वाचलेल्या ग्रथाच्या सख्येचा आणि विद्वत्तेचा मेळ घालणे हे नेहमी बरोबरच असते असा नेम नाही ज्याने दहाच ग्रथ वाचले पण ते मननपूर्वक शोधक बुद्धीने वाचले त्याचे ज्ञान, आणि ज्याने शेकडो भगभर वाचून फेकून दिले त्याचे ज्ञान, या दोहोत काहीच साम्य धरता येणार नाही पारसीकाचे मोठ्या डामडौलाचे अफाट सैन्य आणि शिकदराचे[2] थोडकेच पण कसलेले सैन्य या दोहोचा सा-

१ 'सबधानी' असे अनेकवचन हवे मागे निरनिराळ्या हे विशेषण आहे ---'सं०'

२. शिकदर (Alexander the Great) ख्रि. पू. ३५६ ते ख्रि पू ३२३. म-

[ पुढे चालू ]

म्ना झाला असता जो परिणाम झाला तोच वरील दोन पंडिताचे वाग्युद्ध झाले असता व्हावयाचा! पण इतकेच नव्हे असे 'भाराभर केलेले पाठांतर' सर्वथा 'व्यर्थ' होय इतकेच नव्हे, तर ते अत्यंत अनर्थकारकहि होय. वरच्या सैन्याचाच दृष्टांत घेऊन पाहा त्यात कोणाचा जोडा कोणाच्याच पायात नसल्यामुळे व जो तो आपल्याच थाटात असल्यामुळे ऐन गर्दीच्या वेळेस सगळा घोटाळाच घोटाळा होऊन सैन्याची सख्याच त्याच्या नाशास जशी कारण होते, त्याप्रमाणेच वरील ग्रंथसख्या वाचणारास उपयोगी पडत तर नाहीच, पण उलटी गर्वोत्पत्तीस मात्र कारण होऊन त्यास प्रसगी गोत्यात आणण्यास मात्र खाशी उपयोगी पडते! अथवा सर्वाच्या अतिशय परिचयातला जो व्यापार भोजन त्याचा दाखला घ्या अन्न जसे शरीरास तसे[1] वाचन, श्रवण वगैरे जी ज्ञानाची साधने ती मनास होत एकाने[2] जसे शरीराचे पोषण होते तसेच दुसऱ्याने[3] मनाचे होते या दोन्ही व्यापारात पुष्कळ प्रकारचे मोठे चमत्कारिक साम्य आहे ते असे —जेवण जसे सावकाश, नेमस्तपणाचे व नियमाने असेच केले असता अंगी लागून शरीरास हितावह होते, त्याप्रमाणेच वाचावयाचे ग्रथ जर पूर्ण लक्ष देऊन मननपूर्वक असे बेताबाताने वाचले तरच त्यापासून ज्ञानाचा लाभ होऊन निरनिराळ्या मानसिक शक्ति वृद्धिगत होत जातील नाही[4] तर जसा अधाशी मनुष्य अन्नाशी गाठ पडली असता अखड तृप्ति करून घेऊन पुढे मग आमाशाच्या योगाने होणारी पीडा भोगीत बसतो, त्याप्रमाणेच वाचणाराचीहि स्थिति होते म्हणजे सगळेच अर्धेमुर्धे माहीत, पक्के निश्चित असे काहीच नाही, असे असल्यामुळे भलभलत्या कल्पना व विलक्षण वेडगळ मते त्याच्या मनात शिरून ती अभिमानास्तव त्यास कधीहि टाकावीशी वाटत नाहीत तेव्हा अन्नाचा परिपाक होऊन ते रक्तरूपाने शरीरास मिळाले म्हणजे जसे त्याचे सार्थक झाले, त्याप्रमाणेच आपण जे वाचले त्याचे पुरतेपणी विवेचन करून त्यातले ग्राह्य कोणते, त्याज्य कोणते वगैरेची नीट व्यवस्था झाली, म्हणजे तो मजकूर ज्ञानरूपाने आपल्या मनाशी मिळून तो आपला झाला असे समजावे या ठिकाणी मासाहाराचा दृष्टान्त फार समर्पक होय पशुपक्ष्यादिकाचे मास खाल्ले म्हणजे ते जसे तत्क्षणीच शरीराच्या मासाशी मिळत नाही, तर जठराग्नीने त्याचे पुन पृथक्करण होऊन व तेथील सर्व व्यापार त्यावर क्रमाक्रमाने होऊन शेवटी जेव्हा त्याचे रक्त बनते व रक्ताचे मास होते तेव्हाच ते जसे खाणाराच्या मासाशी मिळते, तशीच गोष्ट ग्रथवाचनाची होय

---

मिडोनियाचा राजा, हा आपला बाप फिलिप् याच्या पश्चात् ख्रि पू ३३६मध्ये गादीवर बसला याने क्रमाने थीबन् लोकाचा व पर्शियन् राजाचा पराभव केला, डेरायस्‌ला पदच्युत केले, सिरिया व फोएनिशिया हे देश पादाक्रात करून भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावरील सर्व शहरे काबीज केली व ईजिप्त जिंकून अलेक्झाड्रिया वसविले पुढे एक मोठे साम्राज्य स्थापून बाबिलोन् हे प्राचीन शहर त्याची राजधानी करण्याच्या हेतूने तो बाबिलोन्‌ला गेला, पण अकराच दिवसात वारला —**'सं०'**

१. वस्तुत 'तशी' असा शब्द हवा होता २ एकाने ह्म० भोजनाने ३ दुसऱ्याने ह्म० वाचनाने. ४ Jack of all trades, but master of none —**'सं०'**

शेकडो जाड मोठमोठाले ग्रंथ जरी घोकून टाकले, तरी जोपर्यंत त्याचे विवेचन करण्यास वाचणाराने आपल्या विचारशक्तीचा उपयोग केला नाही[1], तोपर्यंत नितकी विद्या त्या जाडी पुस्तकातल्या पुस्तकातच राहिली! त्याचा[2] लवलेशहि याच्या मनात शिरला नाही. इसापनीतीतील उंटाप्रमाणे त्याच्या पाठीवर मात्र अन्नसामुग्री पुष्कळ आली, पण पोटात काही नाही! त्या खागा ओझ्याने यास वाहण्याचे मात्र श्रम होतील, व मूर्खत्वास्तव त्याच्या भाराचा यास मोठा गर्वहि वाटेल, पण उपयोग ह्मटला तर जो कोणी शहाणा त्यातील अन्न काढून करून घेईल त्यासच!

असो, वरील अर्ध्याकच्च्या विद्वत्तेचे अनर्थ फार प्राचीन काळापासून सर्व देशातल्या पंडितानी पाहून ठेवले आहेत. ते सर्व भाषातील ह्मणीत व सुभाषितात बहुधा सापडतील. त्यापैकी आम्हास अवगत असलेल्या तीन भाषातले तीन चुटके येथे लिहून हा लेख पुरा करतो.

आपल्या मराठीतील ह्मण आमच्या सर्व वाचकास माहीत असेलच —

**'उथळ पाण्याला खळखळाट फार.'** [3]

पोप्[4] कवीने आपल्या एका लहानशा काव्यात (Essay on Criticism) ह्मटले आहे —

१ 'Think more, read much and talk less' असे एक इंग्रजी वचन आहे. २ वस्तुत 'तिचा' हवे विद्येबद्दल स्त्रीलिंगी सर्वनाम इष्ट. —**'सम्पादक.'**

३ अगर, 'अर्धी (ह्मणजे बरोबर अर्धी नव्हे, तर अपूर्ण भरलेली) घागर डचमळते', 'बोलेल ते करील काय व गर्जेल ते पडेल काय ?' —**'सम्पादक.'**

४ Alexander Pope (1688–1744) अगदी लहानपणी या कापडविक्याच्या मुलाची काव्यप्रतिभा प्रकट झाली. हा फार हुशार विद्यार्थी नव्हता, तरी याने ग्रीक् व लॅटिन् भाषाचे चागले ज्ञान संपादिले. याच्या कवित्वाबद्दल फारच मतभेद आहेत. तथापि Heroic Couplet नावाचा नवीनच काव्यप्रकार याने योजिला व पूर्णत्वाप्रत नेला. आयुष्यातील अनुभव दर्शविणाऱ्या तीव्र, तेजस्वी, परिणामकारक व आटपशीर ह्मणी बनविण्यात याचा हातखंडा असून शेक्स्पिअरखेरीज दुसऱ्या कोणाचीहि अवतरणे याच्याइतकी उद्धृत करण्यात येत नाहीत. अप्रतिम व हुबेहुब शब्दचित्रे काढण्यात ड्रायडन्खेरीज कोणीहि याचा हात धरू शकलाच नाही. हा फार चिडखोर व गर्विष्ठ असल्याने याची सर्वांशी भांडणे होत. त्यामुळे Lady Mary Wortley Montague सारख्याच्याहि स्नेहास याला मुकावे लागले! Pastorals (1708), Essay on Criticism (1711), Rape of the Lock (1712), Windsor Forest & Temple Fame (1723), Dunciad (1728), Essay on Man (1733) हे याचे ग्रंथ. यापैकी शेवटचे दोन सर्वोत्कृष्ट व परिणामकारक आहेत. याने इलियड् (१७१५–२०) व ऑडिसी (१७२५–२६) या ग्रंथाची भाषांतरे केली आहेत. Essay on Man हा याचा सर्वोत्कृष्ट व Dunciad हा तत्कालीन सटरफटर वाङ्मयसेवकाना चागले 'शालजोडीतील' लगावून त्याचा मूर्खपणा सिद्ध करणारा व कमालीची खळबळ उडवून देणारा उपरोधिक ग्रंथ. —**'सं०,**

'A little learning is a dangerous thing,
Drink deep, or taste not the Pierian spring,
There shallow draughts intoxicate the brain,
But drinking largely sobers us again.'

"चुटपुटती विद्या ही फार भयकर आहे विद्यारूप झऱ्याशी तोड लावून एक यथेच्छ प्राशन तरी कर, नाही तर एक बिदुहि घेऊ नको कारण त्याचा असा विचित्र गुण आहे की, थोडेच घोट घेतले असता त्यानी माथे फिरून जाते, पण तेच पुष्कळ जस-जसे घ्यावे तसतसा मद उतरत जातो !"

भर्तृहरि 'नीतिशतका'च्या आरभी म्हणतो —

**अ–ज्ञः सुखमाराध्यः, सुखतरमाराध्यते विशेष–ज्ञः ।**
**ज्ञान–लव–दुर्विदग्धं, ब्रह्मापि च तं नरं न रञ्जयति! ॥ ३ ॥***

"जो केवळ अज्ञान आहे त्याची लवकर समजूत करून देता येते, किवा जो ज्ञाता आहे त्याची तर त्याहिपेक्षा लवकर करता येते. पण ज्ञानाचा अर्धामुर्धाच सस्कार ज्यास घडला आहे अशास नमस्कार असो ! साक्षात् ब्रह्मदेवाच्यानेहि त्याचे समाधान करवणार नाही !"

---

* वामनाने[1] वरील आर्येचे असे भाषातर केले आहे —

**करूं ये समाधान जो मूर्ख त्याचे । धरू ये सुखे चित्त पं जाणत्याचे ॥**
**न जाणे न नेणे अशा पामराला । बुझावूं शकेना विधाता तयाला ! ॥**

१ वामन शेषे, वासिष्ठ गोत्री विजापूरस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. बालपणापासूनच विद्याव्यासगी व तीव्र बुद्धीचा आदिलशाही पातशाहीचा अमल चालू असल्याने बाळपणीच फारसीचा अभ्यास केल्यामुळे याच्यावर पातशाहाची मर्जी बसली पण तो आपणास बाटविणार असे कळताच विजापुरास रामराम ठोकून भिक्षाटन करीत वामन काशीस गेला सस्कृत, वेद व शास्त्रे यात प्रावीण्य मिळवून पूर्वपक्ष–उत्तरपक्ष करून त्याने नाना सभा जिकल्या ! उटभर पोथ्यापुस्तकासह वाद करीत व जयपत्रे घेत तो दक्षिणेत आला द्वैतमताने समाधान लाभेना म्हणून त्याने नाना ग्रथ पाहिले, नाना शास्त्र्याच्या भेटी घेतल्या तरी असमाधान कायम असे आढळल्यामुळे त्याने देहत्याग करण्याचा बेत केला, पण पुढे तो रामदासाच्या सागण्यावरून श्रीमलयाचल पर्वताकडे स्त्री गिराबाई हिला घेऊन गेला कर्मठ इतका की स्त्रीच्या हातचेहि जेवण घेत नसे सारा वेळ 'सच्चिदानद' ब्रह्माच्या चितनात घालवीत वाट चाले व स्वत· जेवण तयार करी एके दिवशी हाताने पाकसिद्धि व मनाने ब्रह्मचितन चालू असता सच्चिदानद स्वामीनी त्याला दर्शन देऊन गुरुपदेशपूर्वक वरुणाने पूर्वी भृगूस पढविलेली 'भार्गवी वारुणी' विद्या दोन मुहूर्तात (४–५ मिनिटात) पढविली ज्ञानेश्वरीच्या तिप्पट म्हणजे सुमारे बावीस हजार ओव्याची यथार्थदीपिका, हा त्याचा मुख्य ग्रथ, ही गीतेवरील टीका आहे. शिवाय भर्तृहरीचे शतकत्रय व जगन्नाथपडिताची गगालहरी याची रसाळ भाषातरे, मनाचे श्लोक व समश्लोकी गीता, हेहि त्याचे

[ पुढे चालू ]

# ५. भाषांतर.

**सानुमती—अहो एषा राजर्षेर्निपुणता ! । जाने, सखी अग्रतो मे वर्तत इति ।***

—शाकुंतल, ६

[**अंक १२वा** (डिसेंबर् १८७४)—(१) 'भाषांतर' शब्दाचा इतिहास व व्याख्या (२) पूर्वीचा भाषांतराचा प्रघात (३) अलीकडील भाषांतरे (४)–(५) भाषांतरकर्त्यास लागणारी साधने (६) भाषांतराचे प्रकार (७) आणखी दोन विभाग (८) गोष्टींची वगैरे भाषांतरे (९) शास्त्रीय ग्रंथांची (१०) कविताग्रंथांची (११) भाषांतराच्या उत्कृष्टत्वाचें प्रमाण (१२) एका आक्षेपाचे निवारण ]

१ 'भाषांतर' हा शब्द अलीकडे इंग्रेजींत[1] नवीन बनलेल्या शब्दांपैकी दिसतो प्राचीन संस्कृतांत तर हा शब्द आढळत नाहीच, कारण त्याच्या प्रयोगाचें कधी कारणच पडलें नसावें भोंवतालची राष्ट्रे त्या काळी आमच्या आर्य लोकांपेक्षा फार कमी ज्ञानसंपन्न असल्यामुळे त्यांच्या ग्रंथांची भाषांतरें संस्कृतांत व्हावी असा कधीच योग आला नाही उलटी संस्कृताची मात्र त्या वेळी व पुढे जवळच्या लोकांनी भाषांतरे केली ही गोष्ट कांही अनुमानावरून व कांही प्रत्यक्ष प्रमाणावरून सिद्ध आहे असो, पुढे संस्कृत माजी[2] पडून प्राकृत किंवा बालभाषा याचा जेव्हा प्रचार झाला तेव्हा त्यांचे संस्कृतांत व संस्कृताचें त्यांत भाषांतर करण्याचा प्रसंग आला पण यास 'भाषांतर' ही संज्ञा नसून 'छाया' हें नाव आजपर्यंत चालत आलें आहे 'छाया' ह्मणजे 'प्रतिबिंब' आपल्या मराठींतहि जुने लोक वरील शब्द ह्मणत नाहीत, तर त्याच्या जागी 'प्राकृतांत अर्थ करणें' असें ह्मणतात अथवा 'टीका', 'व्याख्या', हे शब्द घालतात तेव्हा प्रस्तुत शब्द शुद्ध इंग्रेजींतला आहे असें वाटतें

या शब्दाचा मूळ अर्थ 'दुसरी भाषा' असा होय $ हा कर्मधारय समास असून संस्कृत

---

ग्रंथ प्रसिद्ध आहेत मार्मिक व चमत्कृतिपूर्ण शब्दरचना, अप्रतिम वर्णनशैली, वृत्ताची विविधता, यमकें व अनुप्रास आणि व्याकरणशैथिल्य हे त्यांचे विशेष होत राधाविलास, कात्यायनीव्रत, बालक्रीडा व राधाभुजंग इ० प्रकरणांतील त्यांचा नागवाउघडा अश्लील शृंगार व किळसवाणा चावटपणा पाहून मात्र खंती वाटते ! यथार्थदीपिकाकारास तर तो मुळीच शोभेसा नाही ! तरी पण त्यांतहि रचनाचातुर्य व वर्णनाची हातोटी मात्र अप्रतिम आहेत त्यांची एकंदर उपलब्ध ग्रंथसंख्या पन्नास हजार आहे —**'सम्पादक.'**

* सानुमती (नामें अप्सरा गुप्तरूपें दुष्यंतामागें आकाशांत उभी असतां शकुंतलेची तसबीर पाहून) ह्मणते—"अहो, या राजर्षीची (दुष्यंताची) चित्रकर्मांत सुद्धा काय निपुणता ही ! माझी सखी (शकुंतला) माझ्यापुढे जणू उभीच आहे काय असें मला वाटतें !"

१ 'इंग्रेजींतून' असा शब्द हवा 'इंग्रेजीवरून' असा अर्थ २ मागे —**'सम्पादक.'**

$ या अर्थी 'तथापि भाषांतर–लोलुपोऽहम्' हा चरण[3] आमच्या संस्कृतज्ञ वाचकास आठवेलच (अंक २, पृष्ठ २१, श्लोक २) [टीप ३ पुढील पृष्ठावर पाहा ]

रीतीने 'अन्या भाषेति भाषातरम्' (दुसरी भाषा ह्मणजे भाषांतर) असा याचा विग्रह करतात तेव्हा भाषांतर करणे ह्मणजे जो अर्थ एकाद्या विवक्षित भाषेत असेल तो दुसऱ्या भाषेत उतरणे

२ आता हा प्रघात मराठी भाषेत कसकसा पडत गेला तो पाहू पूर्वी गद्यग्रथच मागे[१] सागितल्याप्रमाणे अगोदर थोडे होते व आताप्रमाणे परभाषेचा अभ्यासहि लोकात होत नव्हता तेव्हा हल्ली जशी इग्रेजीतून अनेक भाषातरे मराठीत झाली आहेत तशी त्या वेळेस फारसीतून किंवा अरबीतून होत नव्हती, एका सस्कृतातून मात्र होत होती खरी, पण ती काव्यातील किंवा शास्त्रीय ग्रथातील मुळीच नसून केवळ पुराणातून प्राकृत कवींनी देशभाषेत छदोबद्ध रचलेली होती या ह्मणण्याचा अर्थ असा अर्थातच नाही की, मराठी कविता जेवढी ह्मणून आहे तेवढी सर्व सस्कृताचे शुद्ध भाषातर आहे हे मत बहुतेकाचे, किंबहुना मोठे ज्ञाते ह्मणविणाराचेहि आहे याच्या मते मराठी भाषा तर एकदरीत निर्जीवच, आणि त्यातून मराठी कविता तर काही पुसूच नये तीत भाकड कथा, वेदान्ताची वेडगळ मते, वेडगळ धर्म, हीच काय ती भरली आहेत पदलालित्य, अर्थगाभीर्य, सुदर अलकार वगैरे प्रकार तीत बिलकूल नाहीत एकदरीत तीस 'कविता' हे नाव तरी कितपत शोभेल याची शकाच आहे! असो, या सर्व मताचा विचार येथे करावयाचा नाही तो सविस्तर केल्यास एक बराच मोठा स्वतत्र ग्रथ होईल प्रस्तुत स्थली इतकेच सागावयाचे की, मराठी कविता सस्कृताचे केवळ भाषातरच आहे किंवा निराळी स्वतत्र आहे याचा पुरतेपणी क्षणभरहि कधी विचार न करता तिच्या प्रतिकूल जे खुशालपणे आपले निक्षून मत देतात त्याची सत्यावर निष्ठा केवढी असेल किंवा आपले अभिप्राय किती तारतम्यत्वविचार[२] करून ते देत असतील हे स्पष्ट दिसते! तुकारामाचे हजारो निरनिराळ्या प्रसगी यदृच्छेने निघालेले उद्गार, वामनाने, आनदतनयाने वगैरे रचलेली स्फुट प्रकरणे, महीपतीने रचलेला[३] 'सतविजय', 'भक्तविजय' इत्यादि, मोरोपताचे 'केकावली', 'सन्मणिमाला', 'सशयरत्नमाला', 'अष्टोत्तरशत रामायणे' इत्यादि ग्रथ, रामजोश्याच्या लावण्या, अमृतरायाचे कटाव—ही सर्व जर सस्कृताची शुद्ध भाषातरेच होत, तर शेकसादीचे 'गुलिस्तान' किंवा मिल्टन्चे 'पॅराडाइज् लॉस्ट्' हीहि तशीच का नव्हत? बरे हेहि सोडून दिले, मुक्तेश्वराचे किंवा मोरोपताचे 'भारत' घ्या हे ग्रथ तरी व्यासकृत 'महाभारता'ची भाषातरे आहेत काय? 'महाभारत' हा केवढा प्रचड ग्रथ आहे, यावरूनच नुसते पाहता कळून येईल की, त्याचे शुद्ध भाषातर ह्मटले ह्म-

---

३ गीर्वाण-वाणीषु विशिष्ट-बुद्धिस्तथापि भाषान्तर-लोलुपोऽहम्।
सत्या सुधायां च यथा सुराणा, स्वर्गाङ्गनानामधरासवे रुचि !॥

अर्थ —ज्याप्रमाणे अमृत असूनहि स्वर्गातील अप्सरांच्या अधरामृताची चट देवाना लागली, त्याप्रमाणे सस्कृत भाषेचे उत्कृष्ट ज्ञान असूनहि दुसऱ्या भाषाबद्दल मला फार आवड आहे —**'सम्पादक.'**

१ पृष्ठ ३५ पाहा २ 'तारतम्य-विचार' असा शब्द हवा 'तारतम्य' हेच भाववाचक नाम आहे, त्याला 'त्व' हा प्रत्यय लावणे म्हणजे 'गाईचे गोमूत्र' म्हणण्यासारखेच हास्यास्पद होय ३ 'रचलेले' असा शब्द हवा ग्रथ दोन आहेत —**'सम्पादक.'**

णजे त्याहूनहि प्रचंड होणार ! पण वरील ग्रंथ पाहिले तर ती त्याची लहान पिलीशीच शोभतील. बरे, दोन्ही भाषांतरे संक्षेपाने केली असतील ह्मणावे, तरी[1] मोरोपंताने येवढाली लांब लांब यमके, मधून मधून चमत्कारिक प्रास वगैरे जे साधले आहेत ते सर्व असूनहि त्याच्या ग्रंथाचे भाषांतरत्व राहणे ह्मणजे लहानसान आश्चर्य नव्हे ! तेव्हा वरच्यासारखी आपल्या विद्वत्तेच्या भरात जे निःशंकपणे मते देतात त्यांनी यावरून असा सुविचार शिकावा की, अभिप्रायाला खरेपण जे येते ते तो सप्रमाण असल्यानेच येते, तो मोठ्या डौलदार शब्दांनी एकदम झोकून दिला असता अज्ञान व भोळे असे श्रोते किंवा वाचक मोठ्या पूज्यभावाने त्यास[2] झेलतील खरे, पण तसे करणे ठीक नव्हे. एक तर ते पंडितत्वास कलंकभूत होय, शिवाय त्याच्या योगाने असत्याचा प्रसार होऊन जो कोणी अमळ शोधक बुद्धीने त्याच्या मताचा विचार करू जातो, त्यास तेव्हाच त्याचा पोकळपणा कळून येऊन त्याची पत मात्र नाहीशी होते !

वरील गोष्टीच्या प्रत्ययार्थ आमच्या वाचकांपैकी जे कोणी संस्कृतज्ञ असतील त्यांनी आदिपर्वातील शकुंतलोपाख्यानाशी मुक्तेश्वराच्या ओव्या व मोरोपंताच्या आर्या ताडून पाहाव्या. तसे केले असता मराठी कवितेचे भाषांतरत्व कितपत उरते ते त्यास तेव्हाच कळून येईल. तितके करूनहि जे वरील ओव्यास व आर्यांस भाषांतरच ह्मणतील, त्यांनी मग कालिदासाच्या जगद्विख्यात 'शाकुंतल' नाटकास, तसेच भवभूतीच्या 'उत्तररामचरित्रा'स वगैरेहि तोच दोष ठेवल्यास तितकेच साजणार आहे !

३. हे मागील काळाविषयी झाले. आता गेल्या पांचपन्नास वर्षांत म्हणजे इकडे इंग्रजी झाल्यापासून जो प्रघात पडला तो पाहू. आमची भाषा अव्वल इंग्रजीत कशी होती, तिजकडे लक्ष देऊन तिच्या नियमनार्थ व अभिवृद्ध्यर्थ आमच्या प्रस्तुतच्या सरकाराने केवढा उद्योग केला, वगैरे गोष्टींचे संक्षेपतः निरूपण आह्मी पहिल्या दोन अंकांत[3] केले आहे, ते आमच्या वाचकांच्या लक्षात असेलच. ही भाषेची अभिवृद्धि

१ शिथिल शब्दप्रयोग. 'तरी' बद्दल 'तर' हा शब्द हवा. —'सम्पादक.'

२ 'त्यास'ऐवजी 'तो' पाहिजे. निर्जीव कर्माला विभक्तिप्रत्यय नको. —'सं०'

३ "गेल्या पन्नास वर्षांत सरकारने विद्यावृद्ध्यर्थ किती खटपट केली ती सर्वांस माहीत आहेच, तीविषयी येथे सविस्तर लिहिणे नको. कोश व व्याकरण या दोहोंशिवाय भाषेस ठरीवपणा येत नाही, यास्तव सरकाराने पहिल्याने ती तयार करवून भाषेच्या उत्कर्षास प्रथम पाया घातला. पुढे हळू हळू गद्यग्रंथांची प्रवृत्ति पडून ते वाढविण्याकरिता सरकारने कित्येक उत्तेजनाचे उपाय करून ठेविले. ते अजूनहि चालू आहेत. या सर्व स्तुत्य प्रयत्नास बरेच यशहि आले, व लोकांत समजूत व उपयुक्त ज्ञान यांचा बराच प्रसार झाला." (अंक १, पॅग ११)

"इंग्रजी भाषा ह्मणजे महातीर्थ होय, तीतून आल्याखेरीज कोणत्याहि ग्रंथास पवित्रता येणे नाही ! असो, आपल्या मराठी भाषेविषयी पाहिले तरी देखील तिच्यासंबंधाचे मुख्य अचाट काम ह्मणजे कोश, हे इंग्रजांनीच आपणाकरिता करून ठेवले आहेत. या कोशाची योग्यता अज्ञानास्तव व दुरभिमानास्तव आमचे लोक फारशी मानीत

[ पुढे चालू ]

मुख्यत्वेकरून भाषानरानी झाली ही भाषातरे मुख्यत इग्रेजीतून आणि त्याच्या खालो-खाल सस्कृतातून झाली इग्रेजीतील भाषातरे नानाप्रकारच्या विषयावर झाली भूगोलविद्या, ज्योतिषशास्त्र, पदार्थविज्ञान, गणिताच्या शाखा वगैरे शास्त्रीय विषयावर व चरित्रे, देशवर्णने, गोष्टीची पुस्तके, इत्यादिकावरहि ती झाली या पुस्तकापैकी अजून दृष्टीस पडणारी अशी थोडीच उरली आहेत असो, दुसरा प्रकार सस्कृताची भाषातरे ही बहुतेक सर्व दक्षिणा प्रैज कमिटीच्या विद्यमाने झाली कालिदास, भवभूति, श्रीहर्ष इत्यादि सस्कृत कवीची नाटके बहुतेक मराठीत होऊन कित्येक छापून प्रसिद्धहि झाली आहेत हे भाषातरकार सर्व जुने पडित असून सगळ्या देशाची भिस्त ज्यावर असे आमचे नवीन विद्वान् मात्र त्यात कोणीच नाहीत ! ही गोष्ट चागली ध्यानात ठेवण्यासारखी असून तीत अर्थहि थोडा आहे असे नाही ! असो, वरील भाषातरकार कैलासवासी परशुरामपतनात्या गोडबोले, वे० शा० स० कृष्णशास्त्री राजवाडे व गणेश शास्त्री लेले हे होत त्यात रा० लेले याची भाषातरे तर मूळार्थास धरून असून पुन अत्यत सरस व शुद्ध असल्याबद्दल त्या त्या वेळच्या चिटणिसानी त्याची रिपोर्टात विशेष तारीफ केलेली आढळते असो, पण वर सागितल्याप्रमाणे सस्कृत नाटकाची जशी भाषातरे झाली, तशी त्या भाषेतील 'रघुवशा'दि अत्यत प्रसिद्ध काव्याचीहि काहीच झाली नाहीत[1] ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे ! याचे कारण काय झाले असेल ते असो[2] !

४ याप्रमाणे आजवर भाषातररूपाने जो ग्रथसग्रह आमच्या भाषेत झाला त्याविषयी लिहिले आता भाषातर कसे असावे, त्याच्या उत्कृष्टतेचे प्रमाण कोणते, वगैरे गोष्टीविषयी विचार करू

५ उत्कृष्ट भाषातरकार ह्मटला ह्मणजे त्यास इतके गुण अवश्य पाहिजेत —एक तर ज्या भाषेतून तो भाषातर करणार ती त्यास पूर्ण अवगत व्हावी[3] ह्मणजे व्याकरण-रचना, अर्थस्वारस्य वगैरे त्याचे त्यास यथास्थित कळले पाहिजे,— दुसऱ्याच्या भाषात-

---

नाहीत, पण आमची अशी खात्री आहे की, त्यानी महाराष्ट्र–भाषेवर जे उपकार करून ठेवले आहेत त्यास पार नाही ! ते तयार करताना शास्त्रीलोकाचे साहाय्य पुष्कळ घेतले, व दोघा साहेबास त्या कामाबद्दल सरकाराने मोठे बक्षीस दिले, हे खरे आहे, पण येवढ्यावरूनच नाक मुरडण्यास कारण ते कोणते झाले ? तितके किंवा त्याहून चौपट साहाय्य मिळाले असते तरी येवढे काम अगावर घेण्यास आमचे विद्वान् कितीक तयार होते ? इग्लिश् लोकाच्या उत्कर्षाचाच नुसता हेवा करण्यापेक्षा त्यास कारणभूत जे त्याचे अनेक गुण त्याचा मत्सर करणे फार समजस व अत्यत हितावह होय " (अक २, पॅरा ७ ) —**'सम्पादक'**

१ गणेशशास्त्री लेले यानी केलेले 'रघुवशा'चे उत्कृष्ट मराठी भाषातर शास्त्रीबोवाच्या मृत्यूनतर एकच वर्षाने ह्मणजे १८८३ साली निर्णयसागर छापखान्याने प्रसिद्ध केले २ 'याला कारण काय झाले असेल ते असो', अगर, 'याचे कारण काय असेल ते असो' असे हे वाक्य हवे होते —**'सम्पादक.'**

३ 'व्हावी' बद्दल 'हवी' असा शब्द पाहिजे पुढील वाक्यात 'त्यास पूर्ण ज्ञान पाहिजे' असाच प्रयोग आहे फार तर 'असावी' चालेल, पण 'व्हावी' चूक —**'सम्पादक.'**

रावर, सांगण्यावर वगैरे त्याने जाता कामा नये. याप्रमाणे मूळ ग्रंथाचा अर्थ सर्व यथास्थित त्याने आपल्या मनांत भरून घेऊन मग तो भाषांतरद्वारा दुसऱ्या भाषेत त्याने[1] ओतू लागावे. दुसरे, ज्या भाषेत भाषांतर उतरावयाचे तिचेहि पहिल्यासारखेच त्यास पूर्ण ज्ञान पाहिजे. तरच पहिल्या भाषेतील अर्थ दुसरींत त्यास नीट ठाकठिकीने बसविता येईल. हे काम पहिल्यापेक्षा किती कठिण आहे हे सांगावयास नकोच! पुष्कळांस स्वतःच्या अनुभवावरून त्याची प्रचीति आली असेलच. मूळ भाषेचा अर्थ चांगला पक्का समजणेंहि तादृश कठिण नाही. पण तोच दुसऱ्या भाषेने यथास्थित व्यक्त करणे ह्मणजे पुष्कळ वेळां मोठी मारामार पडते. ज्याच्या त्याच भाषेत तो अर्थ व्हावा[2] तर अनेक प्रकारांनी व्यक्त करताहि येईल, पण त्याची कल्पना बरोबर परभाषेत ठेवून देणे ह्मणजे परम दुर्घट! उघडच आहे. भाषाभाषांत अनेक प्रकारची तफावत असते. कित्येकांत शब्दसंग्रह अगदी थोडा, कित्येकांत पुष्कळ, कित्येकांत संस्कृताप्रमाणे शब्दसाधनिकेची पुष्कळ सोय असते,—ह्मणजे एका शब्दावरून निरनिराळ्या अर्थांचे[3] वाचक असे शब्द लगेहात[4] हवे तितके करता येतात, कित्येकांत ही सोय फारच थोडी असते, कित्येकांत अशा कांही कल्पना असतात की, दुसऱ्या भाषेने त्या व्यक्त करताच येत नाहीत, किंवा आल्याच तर केवळ सरासरी मात्र करता येतात, याखेरीज शब्दांचे मृदुत्व, सौंदर्य, लालित्य इत्यादि प्रकार, वाक्यरचनेची रीत, भाषापद्धतीची शैली, वगैरेहि आणखी अनेक भेद असतात. तेव्हां या सर्व अडचणींतून बरेपणी निभावून जाणे लहानसान काम नव्हे. त्यास मनुष्याच्या अंगी समजसता व चातुर्य असून भाषांतराच्या कामांत तो चांगला घटावलेलाहि असला पाहिजे. असो, तिसरी गोष्ट ज्याचे भाषांतर करावयाचे ते ते भाषांतर होण्यासारखे पाहिजे. याचा आमच्या कित्येक वाचकांस कदाचित् मोठा अचबा वाटेल! ते ह्मणतील की, याचा काय अर्थ? हवे त्याचे भाषांतर होण्यासारखे आहे! नाही असे काय आहे? पण याचे विवरण अमळ पुढे[5] सविस्तर करण्यांत येईल. असो, तर याप्रमाणे दोहों भाषांची पुरी माहिती भाषांतर करणारास असून ज्याचे भाषांतर करावयाचे त्याची तशी योग्यता हवी, ही उत्कृष्ट भाषांतरास तीन साधने मुख्यतः अनुकूल असली पाहिजेत. याखेरीज चौथीहि एक गोष्ट येथे सांगितली पाहिजे. ती ही की, भाषांतरकर्ता मूळ ग्रंथकाराशी समवृत्ति असला पाहिजे. ह्मणजे मूळच्या ग्रंथकाराची वृत्ति जशी रंगेल, थट्टेखोर किंवा गंभीर, कडक वगैरे असेल तशीच भाषांतर करणाराची असावयास पाहिजे, किंबहुना एकाच ग्रंथांत अशा वृत्ति जसजशा त्याने जागोजाग प्रकट केल्या असतील तसतशा अनुक्रमाने भाषांतरांत उतरल्या पाहिजेत. पण हे काम हवे त्यास साधणार[6] आहे असे नाही. कोणी स्वभावतः केवळ

१ 'त्याने' या शब्दाची जरूर नाही, निरर्थक द्विरुक्ति झाली आहे. 'त्याने घरी जाऊन त्याने लाडू खाल्ला,' हे वाक्य किती हास्यास्पद होईल? —'सम्पादक.'

२ 'व्हावा'बद्दल 'हवा' असा शब्द पाहिजे. ३ 'अर्थांचे' पाहिजे. —'सम्पादक.'

४ ताबडतोब, हात लागताच, हात लावताच, सहजासहजी, विनायास. —'सं०'

५. पृष्ठ ५५, जॉन् गिल्पिन् व पृष्ठे ६०–६२ पाहा. —'सम्पादक.'

६ 'साधणार'पेक्षा 'साधणारे' हा शब्द अधिक योग्य झाला असता. —'सम्पादक.'

थट्टेखोरच असतात, कोणास थट्टा कशी ती मुळीच भासतहि नाही ! यास्तव जो तशा ग्रथाचे भाषातर करू जाईल, तो केवढाहि बुद्धिमान् असला तरी ते काम त्याच्याने निभणार नाही धर्माच्या किवा वेदान्ताच्या विषयास भाषातरकार तसाच पाहिजे, व 'डॉन् किक्सोट्'*सारख्या ग्रथास तसाच निराळा पाहिजे असो, याचप्रमाणे मूळ ग्रथाच्या भाषापद्धतीकडे वगैरेहि भाषातर करणाराने लक्ष दिले पाहिजे

६ याप्रमाणे उत्कृष्ट भाषातर होण्यास कोणकोणते साहित्य पाहिजे ते सागितले. आता भाषातराचे निरनिराळे प्रकार पाहू ग्रथाचे एकदर मोठे दोन विभाग आहेत, एक गद्यग्रथ आणि दुसरे पद्यग्रथ म्हणजे कविता आता दोहोविषयी अनुक्रमाने लिहू

७ गद्यग्रथातहि दोन प्रकार, एक शास्त्रीय आणि दुसरे बाकीचे,--ह्मणजे गोष्टी, कादबऱ्या, चरित्रे, इतिहास वगैरे आता या दुसऱ्याविषयी प्रथमत लिहून मग पहिल्याविषयी विचार करू

८ गोष्टीची भाषातरे करणे हे एकदरीत जरी फार कठिण नाही, तरी ते उत्कृष्ट साधणे ही एकाद्याचीच हातोटी ! मनुष्य जसा जन्मत च कवि निपजावा लागतो तसाच गोष्टी सागणाराहि निपजावयासच पाहिजे असे एका ग्रथकाराचे वचन आहे हे कोणास केवळ अत्युक्तिरूप वाटेल, पण तसे नव्हे चित्तवेधक रीतीने गोष्टीची रचना करावयाची किवा ती सागावयाची ही लहान कला आहे असे नाही हे काम किती कठिण आहे याचा अनुभव ज्यास घेणे असेल त्याने बुकात वाचलेली एकादी मजेदार गोष्ट किवा हरदासाने सागितलेली नक्कल आपण होऊन दुसऱ्यास सागू लागावे, ह्मणजे त्या ग्रथकारात किवा हरदासात आणि आपणात केवढी तफावत पडते ती त्यास तेव्हाच दिसून येईल एकेका मनुष्यास बोलण्याची छाप अशी साधून गेलेली असते की, तशी त्याशी निरतर सहवास केल्यानेहि दुसऱ्यास साधूच नये गोष्ट जुळण्याची[1] खुबी, ज्या शब्दानी ती सागावयाची ते जसे काय अगदी टाकलेले[2]--त्यात लेचापेचा शब्द पडावयाचाच नाही, गोष्टीस ओघाओघाने एकदम आरभ करावयाचा, तिचा शेवटहि तसाच झोकाने करावयाचा, निरनिराळ्या पात्राचे ज्याचे त्यास शोभेसे बोलणे, इत्यादि गोष्टी जो ह्मणेल त्यास साधण्यासारख्या आहेत असे नाही ! असो, तर ज्याप्रमाणे वरील बोलणारास किवा लिहिणारास रसवती अनुकूल असावी लागते त्याचप्रमाणे ती खुबी व ती मजा परभाषेत उतरण्यास भाषातरकर्त्याच्याहि अगी तो गुण असला पाहिजे यास्तव अशी भाषातरे हवा तो करू गेल्यास त्यास अगदी साध-

---

* हा जगद्विख्यात ग्रथ एका स्पॅनिश् ग्रथकाराने दिवाणी तुरुगात असता आपल्या करमणुकीकरिता लिहिला यातील नायकाचेच नाव ग्रथास ठेवले आहे याने 'नाइट्' लोकाच्या गोष्टी इतक्या वाचल्या की, त्यानी याला वेड लागून आपणहि त्यासारखे अद्भुत पराक्रम करावे असे याच्या मनात आले, व तसे करण्यास तो बाहेर पडला असता त्यावर जे प्रसग गुदरले ते या ग्रथात वर्णिले आहेत यात हास्यरस चोहोकडे भरपूर आहे

१ 'जुळणे' हा धातु 'जुळविणे' या अर्थी सकर्मक वापरला आहे --**'सम्पादक'**

२ टाकलेले म्ह० निश्चित, रोकडे, बिनचूक, यथार्थ --**'सम्पादक.'**

